**नांदेड जिल्हयातील मौ.कुंदुर, ता.नायगाव येथील जुन्या पशु उपचार केंद्राची जागा पोलीस स्टेशन कुंटुरच्या पोलीस वसाहतीसाठी हस्तांतर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,
शासन निर्णय क्र.जिपज- ४२०९/प्र.क्र.२५९/पं.रा.८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- १ डिसेंबर, २०१०.

वाचा :- जिल्हा परिषद नांदेड, सर्वसाधारण सभा दि.३.७.२००९, ठराव क्र.२३७

**शासन निर्णय** :- नांदेड जिल्हयातील मौ.कुंदुर, ता.नायगाव येथील मालमत्ता क्र.७७१/१ मधील जिल्हा परिषदेच्या ताब्यातील ५२०८ चौ.फूट इतकी इमारतीसह जागा पोलीस स्टेशन कुंदुरच्या विनंतीनुसार पोलीस स्टेशन कुंदुरच्या पोलीस क्वार्टर्ससाठी पोलीस विभागास हस्तांतर करण्याबाबत जिल्हा परिषद, नांदेड यांनी सर्वसाधारण सभा **दि.३.७.२००९ ठराव क्र. २३७** अन्वये मंजुरी दिलेली आहे. सदर जागा पोलीस स्टेशन कुंदुरच्या पोलीस क्वार्टर्ससाठी हस्तांतर करण्यासाठी प्रथम जिल्हाधिकारी नांदेड यांचेकडे प्रत्यार्पित करुन तशी नोंद महसूल अभिलेखात घेण्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी. तद्नंतर सदर जागा ताब्यात घेऊन ती पोलीस स्टेशन कुंदुर, ता.नायगांव यांना हस्तांतर करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी नांदेड यांच्याकडून करण्यात यावी.

सदरचा शासन निर्णय कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्य व्यवसाय विकास विभाग, गृह विभाग तसेच महसूल व वन विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या **WWW.Maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१२०११८३७२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वॉल्टर डिमेलो )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड

**प्रत माहितीसाठी तथा आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग.
२) जिल्हाधिकारी, नांदेड.
३) पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय व मत्स्य व्यवसाय विकास विभाग (कार्यासन पदुम-३),मंत्रालय.मुंबई.
४) गृह विभाग (कार्यासन पोल-७), मंत्रालय, मुंबई.
५) महसूल व वन विभाग, (कार्यासन ज-७), मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस अधिक्षक, नांदेड.
७) निवड नस्ती (पं.रा.८ कार्यासन),ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

C:\ \suja1107\My Documents\C.R.259 Nov.doc